# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०३१७/प्र.क्र.२२१/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २७ मार्च २०१७.

**विषय** :- पोलीस आयुक्त, ठाणे शहर, यांच्या अधिकारक्षेत्रातील भादवड, ता. भिवंडी येथील इमारत क्र.८, ९, १० व १३ यांमधील पोलीस निवासस्थानांची पुनर्रचना व नूतनीकरण करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/३७१/०९, दिनांक २०.०३.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी पोलीस आयुक्त, ठाणे शहर, यांच्या अधिकारक्षेत्रातील भादवड, ता. भिवंडी येथील इमारत क्र.८, ९, १० व १३ यांमधील पोलीस निवासस्थानांची पुनर्रचना व नूतनीकरण करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी सहायक अभियंता (श्रेणी-१), सार्वजनिक बांधकाम उप-विभाग, भिवंडी, जि. ठाणे, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.२,६७,६४,४८३/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते पुढीलप्रमाणे सुधारित केले आहेत आणि प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १. | भादवड, ता. भिवंडी येथील २८० पोलीस निवासस्थाने, इमारत क्र.८, यांची पुनर्रचना व नूतनीकरण करणे. | रु.६१,५१,५१४/- |
| २. | भादवड, ता. भिवंडी येथील २८० पोलीस निवासस्थाने, इमारत क्र.९, यांची पुनर्रचना व नूतनीकरण करणे. | रु.६१,५१,५१४/- |
| ३. | भादवड, ता. भिवंडी येथील २८० पोलीस निवासस्थाने, इमारत क्र.१०, यांची पुनर्रचना व नूतनीकरण करणे. | रु.६१,५१,५१४/- |
| ४. | भादवड, ता. भिवंडी येथील २८० पोलीस निवासस्थाने, इमारत क्र.१३, यांची पुनर्रचना व नूतनीकरण करणे. | रु.६१,५१,५१४/- |
| **एकूण** | | **रु.२,४६,०६,०५६/-** |

**४.** त्या अनुसार, भादवड, ता. भिवंडी येथील इमारत क्र.८, ९, १० व १३ यांमधील पोलीस निवासस्थानांची पुनर्रचना व नूतनीकरण करण्यासाठी, परिच्छेद ३ मधील तक्त्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, **रु.२,४६,०६,०५६/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३४३/इमा-२, दिनांक २३.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२७१८४४२६३१२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.27 18:46:25 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस आयुक्त, ठाणे शहर, ठाणे.
४) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, ठाणे.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८) निवड फाईल (पोल-७).